**कार्यरत व सेवानिवृत्त राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी व अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांचे करिता वैद्यकीय प्रतिपूर्तीची विमाछत्र योजना.**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४० /भाग -१/ कोषा-प्रशा-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १७ जुलै, २०१७.

**वाचा :** (१) शासन निर्णय क्रमांक:संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/२०१४ कोषा.प्रशा-४, दि.०९ जूलै,२०१४.

(२) शासन निर्णय,क्रमांक:संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/२०१४ कोषा.प्रशा-४,दि.२५ जून,२०१५.

(३) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/२०१४, कोषा प्रशा-४, दि.२८.०६.२०१६.

**प्रस्तावना-**

वरील संदर्भ क्रमांक १ ते ३ च्या शासन निर्णयान्वये शासकीय सेवेच्या अंतिम वर्षात पदार्पित शासकीय अधिकारी/कर्मचारी, व नुकतेच सेवानिवृत्त झालेले शासकीय अधिकारी/कर्मचारी व कुटूंब निवृत्तीधारक यांच्यासाठी वैद्यकीय गट विमा योजना लागू करण्यात आली आहे. आता दि.०१.०७.२०१७ ते ३०.०६.२०१८ या वर्षाकरिता सदर शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

२. शासकीय सेवेच्या अंतिम वर्षात पदार्पित शासकीय अधिकारी/कर्मचारी, व नुकतेच सेवानिवृत्त झालेले शासकीय अधिकारी/कर्मचारी व कुटूंब निवृत्तीधारक यांच्यासाठी वैद्यकीय गट विमा योजना वरील क्रमांक १ च्या शासन निर्णयानुसार लागु करण्यात आली होती.ही योजना गटविमा तत्वावर आहे.सदर योजना दिनांक ०१.०७.२०१७ ते ३०.०६.२०१८ या कालावधीत सेवानिवृत्त होणाऱ्या सर्व गट अ ब क व ड अधिकारी/कर्मचारी व अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना सक्तीची राहील असे योजनेचे स्वरूप आहे.शासकीय सेवेत कार्यरत इतर कोणताही अधिकारी / कर्मचारी स्वेच्छेने या योजनेत आवश्यक तो वार्षिक हप्ता भरून सहभागी होऊ शकेल, तसेच दिनांक ३० जुन २०११ नंतर सेवानिवृत्त झालेला कोणताही अधिकारी/कर्मचारी स्वेच्छेने या योजनेत आवश्यक तो वार्षिक हप्ता भरून सहभागी होऊ शकेल. तथापि ज्या अधिकारी व कर्मचारी यांनी यापूर्वी अशाप्रकारची वैद्यकीय विमा पॉलिसी धारण केली आहे तीच विमा पॉलिसी ग्राह्य धरून संबंधीत आहरण व संवितरण अधिकाऱ्याने खात्री करून प्रस्तुत विमाछत्र योजनेतून त्यांना वगळण्यात यावे.

**शासन निर्णय**

1. शासन असे आदेश देत आहे की, दि. ०१.०७.२०१७ ते दि. ३०.०६.२०१८ या कालावधीत सेवानिवृत्त होणाऱ्या ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी यापूर्वीच इतर कंपन्यांकडून वैद्यकिय विमा पॉलिसी धारण केलेली आहे, त्यांना दि.०९.०७.२०१४ रोजीच्या शासन निर्णयातील योजना सक्तीची राहणार नाही, याविषयी संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांनी खात्री करून सुट द्यावी.
2. सन २०१६-१७ मध्ये जमा झालेल्या एकुण प्रिमियम रक्कम रूपये १६.८२ कोटी च्या तुलनेत रूपये १७.८१ कोटींचे दावे मंजूर करण्यात आले आहेत. तसेच अद्याप पॉलिसीची मुदत दिनांक २५/०७/२०१७ पर्यंत शिल्लक असल्याने सदर कालावधीत उद्भवणा-या दाव्यांची संख्या विचारात घेता claim ratio १३०% च्या वर होणार आहे. त्यामुळे दि न्यु इंडिया ॲश्युरन्स कंपनीने सन २०१७ -१८ करिताचे दरात १०% ची वाढ प्रस्तावित करून सुधारीत प्रिमियम दर खालीलप्रमाणे दिला आहे. तसेच सदर दरात १८% GST समावेश आहे.

| विमाछत्र रक्कम (पती+पत्नीकरिता) | सन २०१६-१७ मधील विमा हप्ता १५%सेवा करासह | सन २०१७ -१८ मधील विमा हप्ता सेवा कर वगळुन | वार्षिक विमा हप्ता १०% वाढ | GST १८% | एकूण विमा हप्ता (६=४+५) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| रू. १ लाख | रु.९७५२/- | रू.८४८०/- | रू.९३२८/- | रू.१६७९/- | रू.११००७/- |
| रू. २ लाख | रु.१११२९/- | रू.९६७७/- | रू.१०६४५/- | रू.१९१६/- | रू.१२५६१/- |
| रू. ३ लाख | रु. १२५०५/- | रू.१०८७४/- | रू. ११९६१/- | रू.२१५३/- | रू.१४११४/- |
| रू. ४ लाख | रु. १३७२९ /- | रू.११९३८/- | रू.१३१३२/- | रू.२३६४/- | रू.१५४९६/- |
| रू. ५ लाख | रु.१४९५२/- | रू. १३००२/- | रू.१४३०२/- | रू.२५७४/- | रू.१६८७७/- |
| रू. ८ लाख | रु.१८६२३/- | रू.१६१९४/- | रू.१७८१३/- | रू.३२०६/- | रू.२१०२०/- |
| रू. ९ लाख | रु.१९८४७/- | रू.१७२५८/- | रू.१८९८४/- | रू.३४१७/- | रू.२२४०१/- |
| रू.१० लाख | रु.२१२२३/- | रू.१८४५५/- | रू.२०३०१/- | रू.३६५४/- | रू.२३९५५/- |
| रू.२० लाख | रु.३२३८९/- | रू.२८१६४/- | रू.३०९८०/- | रू.५५७६/- | रू.३६५५७/- |

३. संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयातील अनुक्रमांक ३ ते ६ येथील अर्टीच्या ऐवजी खालील अटींचा समावेश करण्यात येत आहे.

४. सन २०१४-१५ ,२०१५-१६ आणि २०१६-१७ मध्ये अस्तित्वात असलेली अर्ध वार्षिक विमा हप्त्याची कार्यपध्दती सन २०१७-१८ या वर्षापासुन बंद करण्यात येत आहे.सदरच्या विमा पॉलिसीत नविन नोंदणी करण्याकरिता सुरूवातीचा सहा महिन्याचा कालावधी देण्यात आला आहे. ज्यांना सदरच्या विमा पॉलिसीत सहभागी व्हावयाचे आहे त्यांनी पुर्ण विमा हप्ता भरून सहभागी व्हावे.

५. ज्या सदस्यांनी मागील वर्षी दाव्यांचा प्रतिपूर्तीचा लाभ घेतला आहे, परंतू चालू वर्षी नुतनीकरण न केल्यास अशा सदस्यांना या योजनेत समाविष्ट होण्यास कायमस्वरूपी प्रतिबंधित करण्यात येत आहे.

६. विमा कंपनीच्या असे निर्देशनास आले आहे की, रूग्णालयात दाखल झाल्यानंतर विलंबाने त्याची माहिती TPA ला विमा धारकाकडून दिली जाते त्यामुळे दाव्याची सत्यता पडताळणीसाठी अडचणी येतात. विमा धारकांनी प्रतिपूर्तीकरिता दावा सादर करतांना दाव्याची सूचना त्रयस्त प्रशासकास (TPA) तीन दिवसांच्या आत न दिल्यास दाव्यावर १० % Co Pay लागु असेल. रूग्ण दाखल झाल्याच्या वेळेपासुन २४ तासाचा एक दिवस या हिशोबाने शनिवार, रविवार व सर्व सार्वजनिक सुट्टया वगळून ३ दिवस मोजण्यात येतील.

७. PPN हॉस्पीटल मधील उपचाराचे दर हे पुर्व निश्चित असल्याने मुंबई, ठाणे, नवी मुंबई आणि पुणे येथील PPN (Preferred Provider Network) बाहेरील हॉस्पिटल्समध्ये उपचार घेउन दाव्याची प्रतिपूर्ती अथवा कॅशलेस दावा सादर केल्यास १०% Co Pay लागू असेल.

८. विमा सादर करण्याकरिता नविन विमा धारकांना सक्तीचा १ महिन्यांचा प्रतिक्षा कालावधी असेल त्यानंतर २ महिन्यांच्या आत नविन विमाधारकाने विमा दावा सादर केल्यास अशा दाव्यास १०% Co Pay लागू असेल. सदर अट Capping असलेल्या रोगांच्या बाबतीतसुद्धा लागु राहील.

९. ज्या निवृत्ती वेतन धारकांना विमा हप्ता ( Premium ) त्यांच्या निवृत्ती वेतनातून अदा करावयाची इच्छा आहे. त्यांनी कोषागार अधिका-यास प्राधिकृत करावे.

१०. सदर योजनेची उर्वरित कार्यपद्धती संदर्भाधीन अ.क्र.१ ते ३ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१७१७२९२३९६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anudeep Shrinivas Dighe

Digitally signed by Anudeep Shrinivas Dighe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=75f50c6671abf79e06e7d05c1f27cdae17ad6b947f5b0d740fa705320bede741, cn=Anudeep Shrinivas Dighe
Date: 2017.07.17 17:36:22 +05'30'

**( अनुदीप दिघे)**
उप सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव.
२. मुख्यमंत्र्याचे व उप मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
४. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग ,
५. प्रशासकीय विभागांच्या नियंत्राणाखालील सर्व कार्यालय प्रमुख
६. प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ शाखा), मुंबई,
७. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई,
८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
९. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
११. आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, (सर्व)
१२. प्रबंधक महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई/नागपूर/औरंगाबाद
१३. सर्व विभागीय आयुक्त,
१४. सर्व जिल्हाधिकारी,
१५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
१६. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
१७. महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
१८. महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई

१९. महालेखापाल-२(लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
२०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,
२१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२२. संचालक ,स्थानिक निधी लेखापरीक्षा मुंबई
२३. सहसंचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा,मुंबई,
२४. मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/
२५. संचालक, लेखा व  कोषागारे महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे,
२७. निवड नस्ती, वित्त विभाग,कोषा प्रशा-४.